पर्यटन धोरण, २००६ अंतर्गत महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडून चालविण्यात येणाऱ्या त्याच्या मालकीच्या असलेल्या पर्यटन प्रकल्पांना बिगरशेती करातून संपूर्ण सूट देणेबाबत..

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्र:एनएए १००७/प्र.क्र.३८/ल-५
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ डिसेंबर, २०११

संदर्भ:- १. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र. एनएपी-१००२/ प्र. क्र. २१६/ल-५, दि. ५.१२.२००५
२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. एमटीसी-२००५/२/प्र. क्र. १७२/पर्यटन, दि. १६.१२.२००६

प्रस्तावना: शासनाने सन १९९९ साली नवीन पर्यटन धोरण जाहीर केले होते. या धोरणान्वये पर्यटनास उदयोगाचा दर्जा देण्यात आला. शासनाने अधिसूचित केलेल्या क्षेत्रातील पर्यटन उपक्रमांना, उदयोगास देय असलेले फायदे देता यावेत, यासाठी पर्यटन उपक्रमांचा समावेश "खरेखुरे औद्योगिक प्रयोजन" (Bona-fide Industrial Use) या संज्ञेत दि. १ जुलै, २००० पासून करण्याचा निर्णय शासनाने घेतला होता. पर्यटन स्थळ किंवा गिरीस्थान म्हणून राज्य शासनाने अधिसूचित केलेल्या क्षेत्रातील जमीनींचा वापर पर्यटन उदयोगाच्या प्रयोजनार्थ करावयाचा असल्यास, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ मधील कलम ४४ अन्वये बिनशेती परवानगी घेण्याची आवश्यकता नाही, अशी सुधारणा सन २००५ च्या महाराष्ट्र अधिनियम क्र. २६ अन्वये करण्यात येवून संदर्भाधीन क्र. १ वरील दि. ५.१२.२००५ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्दी देण्यात आली होती. शासनाने आता, संदर्भाधीन क्र.२ वरील दि. १६.१२.२००६ च्या शासन निर्णयान्वये पर्यटन धोरण-२००६ जाहीर केले असल्याने व धोरणांतर्गत असलेल्या वित्तीय प्रोत्साहन या घटकामध्ये महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडून चालविण्यात येणाऱ्या त्यांच्या मालकीच्या असलेल्या सर्व पर्यटन प्रकल्पांना बिगरशेती करातून संपूर्ण सूट देण्याची बाब समाविष्ट असल्याने त्याबाबतचा निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय : पर्यटन धोरण-२००६ अन्वये, पर्यटनाला प्रोत्साहन देण्याच्या प्रयोजनासाठी खालील पर्यटन प्रकल्पांचा पात्र घटक म्हणून समावेश करण्यात आला आहे:-

१. हॉटेल्स, हेरिटेज हॉटेल्स, विश्रामगृह आणि हेल्थ फार्मस्, हेल्थ व वेलनेस स्पा आणि महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या शयन व न्याहरी योजनेंखालील नोंदणीकृत घटक
२. मॉटेल्स व मार्गाच्या बाजूस असलेल्या सुखसोयी
३. अपार्टमेंट हॉटेल/ सर्व्हीस अपार्टमेंटस
४. जलक्रिडा व मनोरंजन उदयाने

५. कला व शिल्पग्राम
६. गोल्फ मैदान
७. शिबिरवाहन व तंबू सुविधा
८. लोहरज्जू मार्ग (Rope way)
९. संकेत केंद्र (कन्व्हेन्शन सेंटर)
१०. गिरीस्थान विकास
११. साहसी पर्यटन प्रकल्प
१२. हाऊस बोटस्
१३. पर्यावरणभिमुख पर्यटन प्रकल्प
१४. संग्रहालये व मत्स्यालये
१५. केंद्रशासनाच्या किंवा राज्य शासनाच्या पर्यटन विभागाच्या समितीने वर्गीकरण करून त्यास मान्यता दिलेले पर्यटन प्रकल्प.

२. उपरोक्त पर्यटन प्रकल्पांपैकी जे पर्यटन प्रकल्प, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडून चालविले जातात व पर्यटन विकास महामंडळाचे मालकीचे आहेत, त्या सर्व पर्यटन प्रकल्पांना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून बिगरशेती करातून संपूर्ण सूट देण्यात येत आहे.

३. सदरहू शासन निर्णय हा शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द केला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११२१६०७४३२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

१६/१२/२०११

(द.ह.कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्यसचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (५ प्रती)
८. विभागीय आयुक्त (सर्व)
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
११. प्रधानसचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१२. सहसचिव/उपसचिव (सर्व), महसूल व वन विभाग
१३. सर्व अवरसचिव/कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग
१४. निवडनस्ती, ल-५